केंद्र शासनाच्या राज्यास भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग-२ (पीएम गतीशक्ती) सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली मार्फ़त (PFMS) कार्यान्वय करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. आयडीसी-२०२३/प्र.क्र.१३/उद्योग-२,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०२३

संदर्भ:- १. वित्त विभाग,शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०२०/प्र.क्र५१/२०/कोषा प्रशा-५, दि. १३/०३/२०२० व ०३/०३/२०२१
२. भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र. F.No१(१२/PFMS/FCD/२०२०, दि.२३/०३/२०२१
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि.०१/०७/२०२१

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या सन २०२२-२३ साठी "भांडवली गुंतवणूकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य सन २०२२-२३" या योजनेअंतर्गत राज्य सरकारना भांडवली गुंतवणूक प्रकल्पांसाठी ५० वर्षाच्या बिनव्याजी कर्जाच्या स्वरुपात आर्थिक सहाय्य प्रदान करण्यात येणार आहे. या संदर्भात केंद्र शासनाच्या व्यय विभागाने दिनांक ०६/०४/२०२२ रोजीच्या पत्रान्वये सदर योजनेची मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. या योजनेअंतर्गत राज्यांना प्रदान करण्यात येणारा निधी राज्याच्या दिर्घकालीन फायद्यासाठी नवीन आणि चालू असलेल्या भांडवली प्रकल्पांसाठी वापरावयाचा आहे. राज्य शासनाने सादर केलेल्या प्रकल्प प्रस्तावांस अनुलक्षून, केंद्र शासनाकडून दिनांक ०६/०४/२०२२ च्या मार्गदर्शक सूचनांमधील भाग-२ पंतप्रधान गतीशक्ती योजनेअंतर्गत उद्योग विभागास (महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ) निधी प्राप्त झाला आहे.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक, दि. ०१/०७/२०२१ अन्वये, केंद्रीय पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोजनाच्या प्रक्रियेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने भारत सरकारच्या दिनांक २३/०३/२०२१ च्या ज्ञापनान्वये निर्धारित केलेल्या सुधारित कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत. सदर सुधारित कार्यपद्धतीनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी संबंधित प्रशासकीय विभागाने एका Single Nodal Agency (SNA) नेमणूक करुन त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेत स्वतंत्र Single Nodal Bank Account उघडावे तसेच योजनाच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उप सचिव दर्जाच्या अधिका-याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याच्या सुचना वित्त विभागाने दिल्या आहेत. केंद्र शासनाकडून राज्यास भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत भाग-२ (पीएम गतीशक्ती) कर्ज स्वरूपात विशेष सहाय्य योजना सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS ) वर मॅपिंग करुन सदर योजनेच्या उद्योग विभागाकरिता राज्य

स्तरावर अंमलबजावणीसाठी State Scheme Manager (SSM), व Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करणे तसेच Single Nodal Agency (SNA) प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Nodal Bank Account उघडण्याची तसेच अमंलबजावणी संस्थासाठी शून्य शिल्लक उपखाती (Zero Balance Subsidiary account) उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

केंद्र शासनाच्या Scheme for Special Assistance As Loan to State for Capital Expenditure (Scheme Code-३८८८) केंद्र सरकारच्या योजनेअंतर्गत २०२२-२३ या वर्षासाठी राज्य शासनाच्या विविध योजनामधील विशिष्ट कामांना निधी उपलब्ध करून देण्यात येणार आहेत. सदर निधीचे, निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन केंद्र सार्वजनिक व्यवस्थापन प्रणाली (PFMS) मार्फ़त करण्याच्या सुचना वित्त विभागाने दिल्या आहेत. त्यानुसार सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्यात आले असून सदर योजना PFMS शी मॅपिंग करून प्राधिकृत बँकेमध्ये स्वतंत्र Single Nodal Bank Account आणि अमंलबजावणी संस्थासाठी शून्य शिल्लक उपखाती (Zero Balance Subsidiary account) उघडण्याच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहेत.

१. सदर योजनांचे सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली (PFMS) वर मॅपिंग करून घेण्याबाबतची कार्यवाही राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, मुंबई यांच्याकडून करण्यात येईल.
२. वित्त विभागाचे शासन आदेश व केंद्र शासनाची दि.२३.०३.२०२१ च्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, “राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य” या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी PFMS प्रणालीच्या अंमलबजावणीसाठी राज्य शासन व अंमलबजावणी यंत्रणा (महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ) यांमध्ये समन्वय व संनियंत्रणासाठी सह सचिव (उद्योग-२) यांना State Scheme Manager (SSM) म्हणून घोषित करण्यात येत आहे. ते सदर योजनेचे सिंगल नोडल एजन्सी (Single Nodal Agency)म्हणून काम पहातील.
३. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीसाठी State Scheme Manager (SSM) स्तरावर स्वतंत्र बँक खाते (Single Nodal Bank Account), बँक ऑफ महाराष्ट्र, मंत्रालय शाखा व अंमलबजावणी यंत्रणासाठी शून्य शिल्लक उपखाती (Zero Balance Subsidiary account) बँक ऑफ महाराष्ट्र, सिप्झ शाखा, अंधेरी (पूर्व) या बँकेत उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.
४. सदर खात्यांचा वापर केवळ उक्त योजनेच्या प्रयोजनासाठीच करावा.
५. सदर SSM स्तरावरील खाते व अंमलबजावणी यंत्रणेसाठीचे खाते हे PFMS प्रणालीशी संलग्न करावे.
६. सदर योजनोचा निधी केंद्रीय पध्दतीने संबंधित यंत्रणांना वितरीत करण्याकरीता कोषागारातून प्रत्येक योजनेसाठी प्राप्त होणारा निधी प्रथमत: संबंधित योजनेच्या PFMS प्रणालीशी संलग्नीत SSM स्तरावरील बँक खात्यात जमा करावा आणि तद्नंतर संबंधित यंत्रणांनी त्यांच्या स्तरावरुन निवडलेल्या प्रकल्पांना केंद्रीय पध्दतीने वितरीत करावा.
७. सदर SSM खाते भविष्यात बंद करण्यात आल्यास, त्यामधील शिल्लक रकमेचा ताळमेळ घेऊन शिल्लक अखर्चीत रक्कम योग्य त्या शासन लेखाशीर्षाखाली तात्काळ जमा करावी.

२.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२१५१६४१४९३६१० असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे. हे असे आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने आदेशानुसार व नावाने,

VINOD SOPANRAO MENDHE

Digitally signed by VINOD SOPANRAO MENDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=3dfd984bb7c5aede090473e34b1c93fa9f36d97d56c0cf07812a43c5ca5d6a24,
pseudonym=323A3B33024CA3B9B9527D203D8EA5C5D8D48849,
serialNumber=6CAF7EAF9A975C60BD4278CDB26344D74E2548D2175C80BA946EF0383ABE5111, cn=VINOD SOPANRAO MENDHE
Date: 2023.03.02 17:03:14 +05'30'

**( वि. सो. मेंढे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. मंत्री (उद्योग) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे खाजगी सचिव.
२. प्रधान सचिव, (उद्योग) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
४. प्रधान महालेखापाल १-(लेखापरीक्षा)महाराष्ट्र.मुंबई ,
५. प्रधान महालेखापाल १-(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र, मुंबई.
६. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षण)-२ महाराष्ट्र, नागपूर.
७. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र,नागपूर.
८. सह सचिव (उद्योग-२), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१०.उप सचिव ( कोषा-प्रशा) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.उप सचिव ( अर्थबळ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.कक्ष अधिकारी (रोख शाखा), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.निवडनस्ती (उद्योग-२).